**मोटार अपघात दावा न्यायाधिकरण**
**अतिरिक्त संवर्गातून अधिकारी/कर्मचारी उपलब्ध करुन देणेबाबत**

## महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन आदेश, क्रमांक : एमसीटी-१२०३/१७५५/प्र.क्र.२१५/परि-५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : ३० जानेवारी, २००४

वाचा :- १) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक: एमसीटी-०१०१/११६५/सीआर-११७ (ब)/परि-५ दि. २.१२.२००३

२) वित्त विभाग पत्र क्र.संकीर्ण १००३/संक्र.२४१२/वित्तीय सुधारणा, दि.९.१.२००४

३) मोटार अपघात दावा न्यायाधिकरण पत्र क्र.मोअदान्या २६२७/२००३, दि. १५.१२.२००३

__आदेश__ : मोटार वाहनाच्या वापरामुळे झालेल्या व्यक्तीचा मृत्यू किंवा त्यांना झालेली इजा किंवा त्यामुळे झालेल्या तिस-या पक्षाच्या कोणत्याही मालमत्तेचे नुकसान किंवा दोन्हीही यांचा अंतर्भाव असणा-या अपघाताच्या संबंधातील नुकसान भरपाईसाठीच्या दाव्यावर अभिनिर्णय करण्याच्या प्रयोजनासाठी बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या हद्दीत समाविष्ट असलेल्या क्षेत्रासाठी ३ अतिरिक्त मोटार अपघात दावे न्यायाधिकरण स्थापन केली आहे त्या अनुषंगाने निर्माण केलेल्या पदांपैकी वित्त विभागाच्या अतिरिक्त संवर्गातून उपलब्ध करुन दिलेल्या ३ शिपाई संवर्गातील कर्मचा-यांना त्यांनी रुजू झाल्याच्या दिनांकापासून मोटार अपघात दावा न्यायाधिकरण बृहन्मुंबई येथे नियुक्ती देण्यास शासन मंजूरी देत आहे.

तपशील खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | कर्मचा-याचे नाव व पदनाम | नवीन पदनाम | वेतनश्रेणी | मूळ कार्यालयीन पत्ता |
|---|---|---|---|---|
| १. | श्री. पी.पी. पवार शिपाई/चपराशी | शिपाई | २५५०-३२०० | मुख्य कार्यकारी अधिकारी, आरे, गोरेगांव, मुंबई. |
| २. | श्री. जयप्रकाश मु. यादव पहारेकरी | शिपाई | २५५०-३२०० | बृहन्मुंबई दूध योजना, वरळी, मुंबई |
| ३. | श्री. प्रशांत डी. सावंत, पहारेकरी | शिपाई | २५५०-३२०० | बृहन्मुंबई दूध योजना, वरळी, मुंबई |

३. अतिरिक्त संवर्ग कक्ष यांच्याकडे उच्चश्रेणी लघुलेखक, शिरस्तेदार, अधिक्षक व बेलीफ (लिपीक) या संवर्गातील पदे भरण्यासाठी अर्हताप्राप्त कर्मचारी उपलब्ध नसल्यामुळे सदर पदे विहित मार्गाने भरण्याबाबत ना-हरकत प्रमाणपत्र वित्त विभागाने दिलेले आहे. त्यामुळे सदर पदे विहित मार्गाने भरण्यात यावीत.

३. सदर आदेश वित्त विभागाच्या पत्र क्रमांक. संकीर्ण १००३/संक २४१२/२००३/वित्तीय सुधारणा-१, दि.९.१.२००४ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( आ. का. [illegible] )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई (पत्राने)
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा, महाराष्ट्र - १, मुंबई
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
कृषि व पदुम विभाग (पदुम शाखा), मंत्रालय, मुंबई,
मुख्य कार्यकारी अधिकारी, आरे, गोरेगाव, मुंबई,
आस्थापना अधिकारी, बृहन्मुंबई दूध योजना, वरळी, मुंबई
वित्त विभाग ( कार्यासन व्यय -८ / वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई,
गृह विभाग ( कार्यासन - बीमुडी - १),
निवड नस्ती, परि-५.